# बेले, शेवटचे खेचर

## नागरिक अधिकाराची कहाणी

कैल्विन रामसे    मराठी : अश्विनी बर्वे



# बेले, शेवटचे खेचर

## नागरिक अधिकाराची कहाणी

एलेक्स एका बेंचवर बसून आपल्या आईची वाट बघत होता. त्याने समोरच्या बागेत एक खेचर भाज्या खातांना पाहिले. जेव्हा मिज पेटटवे एलेक्सजवळ येवून बसल्या, तेव्हा त्यांनी त्याबद्दल विचारले.

“ते बेले खेचर आहे ना?” त्या म्हणाल्या, “ते कितीही भाज्या खाऊ शकतो. कारण त्याने त्या कमावल्या आहे.”

तर इथं गीस-बेंड, अलबामा, पासून बेले खेचरच्या गोष्टीला सुरुवात होते. बेले एक सामान्य खेचर होता आणि १९६०च्या नागरिक अधिकाराच्या आंदोलनात त्याने महत्वपूर्ण भूमिका निभावली होती. ही कहाणी वास्तविक घटनांवर आधारित आहे. डॉ. मार्टिन लूथर किंग जूनियर यांच्या भाषणाने प्रेरित होऊन आफ्रिकी अमेरिकन निर्धन समुदायाने अधिकाऱ्यांना विरोध करत, मत देण्यासाठी स्वतःची नोंदणी केली. मत देण्यासाठी त्यांनी खेचर ओढत असणाऱ्या गाडीने प्रवास केला. डॉ. किंगच्या हत्येनंतर, गीस-बेंडच्या दोन खेचरांनी अटलांटाच्या रस्त्यावर डॉ. किंगची शवपेटी असणारी वॅगन ओढली.

जेव्हा त्या तरुण मुलाने कोमल बेलेच्या डोळ्यांमध्ये बघितले तेव्हा त्याला व्यक्तिगतरीत्या आपल्या समाजाचा इतिहास समजला. कदाचित वाचणाऱ्यांना तसेच वाटेल.



एलेक्स एका दुकानाच्या बाहेर बेंचवर बसला होता. त्याला खेळायला जावं वाटत होतं. पण आईने त्याला वाट बघायला सांगितले होते.तिथं बसल्या बसल्या एलेक्सला काहीच करता येत नव्हते. तेव्हा त्याने रस्त्याच्या पलीकडच्या बागेत, एक म्हातारे खेचर चरतांना पाहिले. हवा एकदम स्थिर होती. चीनाबेरीच्या झाडाचे एकही पान हलत नव्हते. इतकी शांतता होती की, एलेक्स बागेत भाजीची हिरवी पाने कुरतडणाऱ्या खेचराचा आवाज ऐकू शकत होता. मध्ये मध्ये खेचर आपल्या मोठ्या कानांनी माश्या उडवत होते.

तेव्हा एक म्हातारी बाई हळूहळू लाकडी जिन्याच्या पायऱ्या चढत दुकानापर्यंत पोहचली आणि एलेक्सच्या जवळच्या बाकड्यावर बसली. तिने एक घडी केलेल्या वर्तमानपत्राचा स्वतःसाठी पंखा केला. एलेक्सने तिला डोळ्याच्या कोपऱ्यातून बघितले, ती स्त्री खेचराकडे बघत होती.

म्हातारी स्त्री हसत आणि हळू आवाजात म्हणाली, “मला मसालेदार हिरव्या भाज्या, सरबत आणि मटणाच्या बरोबर खायला आवडतात.”

एलेक्स हसला.

“मी विचार करत होते की हे म्हातारे खेचर फक्त हिरव्या भाज्या कशा खाऊ शकते,” ती महिला म्हणाली.

“त्याला खाण्याची परवानगी आहे का?म्हणजे माझ्या म्हणण्याचा अर्थ असा होता की, कोणाच्या बागेतल्या भाज्या ते अशा प्रकारे खाऊ शकते का?” एलेक्सने विचारले.





“म्हातारा बेले! तो आपल्या इच्छे नुसार पाहिजे तेवढी हिरवी भाजी खाऊ शकतो.त्याने तेवढं कमावलं आहे.” एलेक्सकडे सरळ बघत महिला म्हणाली. “बघ ना मीच त्या खेचराला मोकळं सोडलं आहे. आणि ती बाग माझी आहे. मी विचार केला की थोड्यावेळ सावलीत बसून आराम करावा आणि मग त्याला बाहेर काढावे.”.

“पण, मॅडम, तुम्ही त्या खेचराला आपली हिरवी रोपे का खाऊ देत आहात?”

“बाळा माझं नाव मिज पेट्वे आहे,” महिला म्हणाली. “तुझं नाव काय आहे?”“

“मी एलेक्स आहे,” मुलाने उत्तर दिलं.

"ठीक आहे, एलेक्स, माझ्या बागेत आमच्या दोघांना पुरेल एवढी भाजी आहे. आणि बेले एक खूप विशेष खेचर आहे. तो ग्रीस-बेंडचा हिरो आहे. मला त्याचा सन्मान करावा वाटतो.”

“त्या म्हाताऱ्या खेचरात खास असं काय आहे?” एलेक्सने उभं राहत विचारलं.




महिलेने एक खोल श्वास घेतला. “ती एक मोठी गोष्ट आहे. जर तुझ्याकडे वेळ असेल तर मी ती तुला सांगू शकते.”

एलेक्स संकोचला. आधीच त्याला ती म्हातारी स्त्री वेडसर आणि चक्रम वाटत होती. पण त्याला उत्सुकता वाटत होती आणि आता त्याच्याकडे दुसरे काही कामही नव्हते.

"गीस-बेंड नेहमीच एक गरीब वस्ती होती," महिलेने सुरु केले. “इथं शेतीशिवाय दुसरं काहीच नव्हतं. शेतात नांगर चालवण्यासाठी नेहमीच खेचर लागत असत. आम्ही खूप कमी लोक कार घेवू शकत होतो.”

“मग लोक बाजारात कसे जात होते?” एलेक्सने विचारले.

“बघ आम्ही लोक स्वतःला बेंडर्स म्हणत असू. आणि इकडेतिकडे जाण्यासाठी आम्ही खेचरांचा उपयोग करत असू. बेले आमच्याजवळ खूप वर्षांपासून आहे. तो आमच्याजवळ तेव्हा पण होता जेव्हा डॉ. मार्टिन लूथर किंग इथे भाषण देण्यासाठी आले होते. ही १९६५ची गोष्ट असेल.”

"डॉ. मार्टिन लूथर किंग यांच्याबद्दल शाळेत आम्हांला सांगितले होते. तुम्ही त्यांना भेटल्या होत्या का?” एलेक्सने विचारले.



“हो तर! त्या रात्री एक भयानक वादळ आलं होतं. खूप लोकांनी विचार केला की डॉ. किंग आपल्यासारख्या गरीब लोकांना भेटायला येणार नाहीत. मी बेले बरोबर इथून थोडसं दूर त्यांची वाट बघितली. शेवटी अर्ध्या रात्रीनंतर डॉ. किंग तिथं पोहचले.पण त्या इतक्या रात्री सुद्धा ते आमच्याशी बोलले.त्यांनी प्लीजेंट ग्रोव बॅपटिस्ट चर्च मध्ये आम्हां लोकांसाठी जोरदार भाषण केले.”

“ते काय म्हणाले?” एलेक्सने विचारले.



"ठीक आहे,  त्या काळात, कॅमेडेनला जाण्यासाठी एक नदी पार करावी लागे. कॅमेडेन मध्ये काही दुकानं होती आणि नोकऱ्या सुद्धा होत्या. डॉ. किंग यांनी आम्हांला नावेने कॅमेडेन जावून आपलं मत नोंदवायला सांगितलं.”
“स्वातंत्र्यासाठी नदी पार करा!” त्यांनी संदेश दिला. “भले आपण गरीब मातीत कष्ट करणारे शेतकरी असू, गुलामाचे वंशज असू आणि ओझी वाहण्यासाठी आपल्याकडे फक्त खेचर असेल,” ते म्हणाले, “मी इथं गीस-बेंडला हे सांगण्यासाठी आलो आहे की आपल्याला सुद्धा एक अधिकार आहे.” डॉ. किंग म्हणाले” की आपल्यासारख्या अश्वेत लोकांना मत देण्याचा अधिकार आहे. तुला हे माहित आहे का  एलेक्स, त्या काळात  विलकॉक्स काउंटीत कोणत्याही अश्वेत  व्यक्तीला मत देण्याची हिंमत नव्हती.”

“तुम्हांला मत देण्याची भीती वाटत होती का?” एलेक्सने विचारले.



मिज़ पेट्टवेने खोल श्वास घेतला आणि एक क्षण विचार केला. "डॉ. किंग बोलल्यानंतर आम्ही घाबरलो नाही. आम्ही स्वतःला आमच्या खेचरांसारखे मजबूत समजू लागलो. आणि मग आम्ही तेच केले जे डॉ. किंग यांनी आम्हांला करायला सांगितिले होते. इतके सारे लोक मत नोंदवायला गेले की आमची छोटी बोट बुडायला लागली होती. काही बेंडर्स, डॉ. किंगच्या बरोबर सेल्मा, मॉन्टगोमरी, बर्मिंघम, आणि वॉशिंग्टन मध्ये मोर्च्यात भाग घेण्यासाठी गेले. बेंडर्स सुद्धा खेचरांसारखे निष्ठावान असतात," मिज़ पेट्टवे म्हणाल्या.

“आम्ही शाळेत त्या मोर्च्याबद्दल वाचलं आहे!” एलेक्स म्हणाला.

“खूप छान,पण आम्ही जे केलं त्यामुळे कॅमेडेनचे गोरे लोक नक्कीच घाबरले असतील, कारण गोऱ्या लोकांनी लगेच बोटीची सेवा बंद केली. गोरा शेरिफ खूप बदमाश होता आणि त्याला आमची जागा आम्हांला दाखवायची होती. तो बातमीदारांना म्हणाला, “ते काळे आहेत म्हणून आम्ही आमची बंद केली नाही.आम्ही नाव यासाठी बंद केली कारण ते लोक हे विसरले की ते काळे आहेत.”



"जेव्हा मत देण्याची वेळ आली, तेव्हा आमच्या जवळ नदी पार करण्याचा कोणताच मार्ग नव्हता. पण आता आम्हांला कोणी रोखू शकणार नव्हते. बेंडेर्स, म्हाताऱ्या बेले सारखे होते. ते फसले नाहीत, उलट ते मजबूत, हट्टी, जिद्दी होते. आम्ही काही लोकांना कारमध्ये घातले.त्यात लोकांना कोंबून कोंबून भरले.

बाकी लोकांना खेचराने ओढले. मत देण्याच्या दिवशी लोक, नदीची परिक्रमा करत कॅमेडेन पोहचले. तिथं पोहचण्यासाठी त्यांना अर्धा दिवस लागला. पण ते काम करण्याच्या योग्यतेचे होते. लोकांनी गाणी म्हटली आणि पूर्ण शहरात टाळ्या वाजवल्या. कॅमेडेन चे लोक हे सगळं बघून हैराण झाले.

"तुम्ही त्यांना दाखवून दिलं!" एलेक्सने हसत म्हटलं. "म्हणून बेले एक हिरो आहे का?"

"अजून पुष्कळ गोष्टी बाकी आहेत.मत दिल्यामुळे खूप लोकांच्या कॅमेडेन मधल्या नोकऱ्या गेल्या.गोष्टी खराब झाल्या. नोकरी शिवाय राहावे लागत असल्याने लोकांना उपाशी राहण्याची वेळ आली. म्हणून आमच्यापैकी काहीजण अलबर्टा मधल्या "फ्रीडम क्विल्टिंग बी" मध्ये सामिल झाले.मग आम्ही आमची सामुहिक गोधडी बनवण्याची कंपनी सुरु केली. गीस-बेंडच्या महिलांनी नेहमीच गोधड्या शिवल्या आहेत.जगात सगळ्यात सुंदर गोधड्या इथेच शिवल्या जात होत्या.लवकरच आमच्या रजया पूर्ण अमेरिकेत विकल्या जाऊ लागल्या. हळूहळू आम्ही प्रसिद्ध होवू लागलो..

“म्हणून मी आज इथं आहे, माझी आई रजई खरेदी करण्यासाठी इथं आली आहे! एलेक्स म्हणाला. “हा एक सुखद शेवट आहे नाही?”



“पण हा बेलेच्या कहाणीचा शेवट नाही,” मिज़ पेट्टवे ने नरम आवाजजात म्हटलं. "एलेक्स, १९६८ मध्ये चार एप्रिलला काय झालं? याबद्दल तू शाळेत काही वाचलं आहेस का?”

एलेक्सने मिज़ पेट्टवेच्या डोळ्यात बघितलं. ती खूप दुःखी होती. “त्यादिवशी डॉ. किंग यांना गोळी लागली, का?” त्यांनी विचारलं, आणि पहिल्यांदा एलेक्सला खूप उदास वाटू लागलं.

“हो, गीस-बेंडमध्ये प्रत्येकजण दुःखी होता.” मिज़ पेट्टवेने खोल श्वास घेतला आणि मग झाडांकडे बघितलं हलकेसं वारं पानं हलवत होते.

“आम्हांला एक फोन आला, ज्यात डॉ. किंग के अंतिम संस्काराच्या वेळी अटलांटाच्या रस्त्यावर त्यांची शवपेटी ओढण्यासाठी आमच्या खेचरांची गरज होती न का घोड्यांची. खेचर त्यांचा वेळ घेतात, खूप कष्ट करतात, आणि कधीही हार मानत नाही. खेचर सुंदर नसतात, पण त्यांचे एक अस्तित्व असते. ही आमच्यासाठी एक खूप सन्मानाची गोष्ट होती की डॉ. किंगच्या के अंतिम संस्काराच्या वेळेला बेंडर्सच्या खेचरांचा उपयोग करण्यात आला.



"बेले आणि एडा नावाचे अजून एक खेचराला अटलांटाला जाणाऱ्या ट्रक मध्ये चढवलं गेलं.पण नेहमीसारखंच हे काम सोप्प नव्हतं.राज्य पोलिसांनी ट्रक अडवला आणि ड्रायव्हरला जनावरं राज्याच्या बाहेर नेण्याचे परमिट दाखवायला सांगितलं. योग्य कागद नसल्या कारणाने पोलिसांनी ड्रायव्हरला अटक करण्याची धमकी दिली.

“आम्ही अटलांटाच्या डॉ. किंगच्या मुख्यालयाला खबर दिली, आणि ते त्वरित राज्य पोलीस अलबामा आणि जॉर्जियाच्या राज्यपालांशी बोलले. ते म्हणाले की जर पोलिसांनी त्यांना डॉ. किंग याच्या अंतिम संस्काराला जाण्यासाठी अडवले तर पूर्ण देशात ही बातमी वर्तमानपत्र आणि टीव्हीवर आली तर ती लज्जास्पद वाटेल. त्यानंतर सैनिकांनी आमच्या बेले आणि एडाला अटलांटा मध्ये प्रवेश करू दिला.”

“काय बेलेने डॉ. मार्टिन लूथर किंगची शवपेटी ओढली?” एलेक्सने विचारलं.



“हो, बेले आणि एडाने हिंमतीने साडे तीन मैल अंतरापर्यंत डॉ. किंग यांची शवपेटी ओढली. ते रडणाऱ्या-विव्हळणाऱ्या लोकामधून गेले. जसजशी शवपेटी पुढे जात होती. तसतसे लोक बाहेर पडू लागले त्यांनी खेचरांना आणि शवपेटीला स्पर्श केला. कल्पना कर, त्या खेचरांना हजारो हातांनी स्पर्श केला. पण ते हळू आणि शांततेने चालत राहिले. ना ते मागे हटले ना ते पुढे जाण्यास घाबरले. ते फक्त चालत राहिले.

"डॉ. किंग यांचे अंतिम संस्कार जगातल्या सर्व टीव्ही चॅनेलवर दाखवले गेले. एबेनेज़र बॅपटिस्ट चर्च जवळ साठ हजार लोक एकत्र झाले होते.आणि दहा हजार लोकांनी रस्त्यावर रांग लावली होती.आमचा आम्हांला खूप अभिमान वाटला! आणि याच कारणामुळे आम्ही गीस-बेंड मध्ये आमच्या शेवटच्या खेचरावर खूप प्रेम करतो. म्हणून म्हाताऱ्या बेलेला माझ्या बागेतल्या भाज्या पोटभर खाऊ देते.”



एलेक्स आणि मिज़ पेट्टवेने म्हाताऱ्या बेलेकडे बघितले.त्याने भाजी खाणं बंद केलं होतं आणि त्याने डोकं वर करून त्यांच्याकडे बघितलं. मग ते दोघं हसू लागले.

“बघ,आता त्याचं पोट भरलं आहे," मिज़ पेट्टवे हळूहळू बाकड्यावरून उठत म्हणाली, “तुला त्याला भेटावं वाटतं का?”

“हो, मॅम," एलेक्स जिन्यावरून उतरला आणि बेलेजवळ गेला. तिथं जाऊन त्याने बेलेचे केसाळ कान खाजवले. एलेक्सने खेचराच्या डोळ्यात बघितलं आणि त्याला आश्चर्य वाटलं की त्या खेचराने किती महत्वपूर्ण इतिहास बघितला असेल. एलेक्स म्हणाला,” मला बेले बद्दल सांगितल्याबद्दल तुमचे आभार.”

“आता तुला डॉ. किंगच्या म्हणण्यात काय अर्थ होता हे लक्षात आलं असेल.त्यांनी आम्हाला सांगितलं होतं की भले आपण सरळ, कठीण जीवन जगत असू, पण आपल्याला एक अस्तित्व आहे.” ते म्हणाले.

“एवढंच नाही तर एक म्हातारे खेचर हिरो होवू शकतं” एलेक्स म्हणाला. मिज़ पेट्टवे हसली आणि मग ती बेलेला आपल्या बरोबर घेवून निघून गेली.



# लेखकाची टिप्पणी

मी प्रथम रेवरेंड जेम्स ई. ऑरेंजकडून बेलेची कहाणी ऐकली. जेव्हा नागरिक अधिकार नेता डॉ. मार्टिन लूथर किंग जूनियरची ४ एप्रिल१९६८ला हत्या झाली होती,तेव्हा ते त्यांच्याबरोबर काम करत होते. डॉ. किंग यांची इच्छा होती की जे खेचर शेतात नांगर चालवतात त्यांनीच त्यांची शवपेटी ओढावी. त्यांनी जीवन भर गरीब अश्वेत लोकांचे जीवन अधिक चांगले करण्यासाठी काम केलं होतं.खेचर त्या लोकांचे शक्तिशाली प्रतिक होते.

रेवरेंड ऑरेंज यांना खेचरांना शोधण्याचे काम दिले होते. त्यांच्या लक्षात होते की डॉ. किंग यांनी अनेकवेळा गीस-बेंडमधिल लोकांना भाषण दिले होते आणि तिथले लोक इतर ठिकाणी त्यांच्याबरोबर मोर्च्यात सामील झाले होते. त्यांना हे माहित होते की डॉ. किंग खूप काळ बेंडर्सचे प्रशंसक होते आणि बेंडेर्स सरळ लोक होते ज्यांनी कठीण काळाशी सामना केला होता.

गीस-बेंड आणि तिथल्या खेचरांनी डॉ. मार्टिन लूथर किंग जूनियरच्या इतिहासात एक मोठी भूमिका निभावतील, जशी भूमिका डॉ. किंग यांनी तिथल्या लोकांच्या जीवनात निभावली होती. खरंतर १९६५चा नॅशनल व्होटिंग राईट्स ॲक्ट पारित झाल्यानंतर मत देणारे पहिले आफ्रिकी अमेरिकन हे कॅमेडेन, अलाबामाचेच लोक होते.काही वर्षानंतर कॅमेडेनने विसाव्या शतकातल्या पहिला अश्वेत शेरिफ निवडला.

जेव्हा डॉ. किंग यांच्या हत्येची बातमी आली, तेव्हा बेंडर्स सहजतेने खेचर पाठवायला तयार झाले. बेले आणि एडाला. जनावरांना एका पिकअप ट्रक मध्ये घातलं .पण प्रवासाच्या सुरुवातीलाच ट्रक राज्याच्या सीमेवर रोखला. जेव्हा ड्रायव्हर प्राण्यांना घेवून जाण्याचे परमिट दाखवू शकला नाही तेव्हा त्याला अटलांटाला जाण्याची परवानगी मिळाली नाही.

मदत मागण्यासाठी अलबामा आणि जॉर्जिया या दोन्ही राज्याच्या राज्यपालांना डॉ. किंग यांच्या कामगारांनी फोन केले. या करावाईमुळे अंतिम संस्काराला वेळ होईल आणि जेव्हा त्यांनी ही राष्ट्रीय बातमी होईल अशी धमकी दिली, तेव्हा दोन्ही राज्यपाल तयार झाले आणि त्यांनी बेंडर्सच्या खेचरांना अटलांटाला जाण्याची परवानगी दिली.

९ एप्रिल,१९६८ला बेले आणि एडाने एबेनेज़र बॅपटिस्ट चर्च ते मोरहाउस कॉलेज पर्यंत हळूहळू नम्रतेने डॉ. किंग यांची शवपेटी ठेवलेली वॅगन ओढली. तिथं डॉ. किंग्सचे एक शिक्षक रेवरेंड बेंजामिन मेस यांनी डॉ. किंग यांना श्रद्धांजली दिली. अनुमान असं आहे पन्नास हजार लोकांनी वॅगनच्या मागे शांततेने जुलूस काढला. बेले आणि एडाने आपली भूमिका चांगली निभावली.

